**गोंदिया जिल्ह्यातील गोंदिया तालुक्यातील २ योजनाबाह्य रस्त्यांचा ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समावेश करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१३९/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १० ऑक्टोबर, २०१८.

पहावे :-१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्र. का-प्रआ/६३२५ दि. २३/०७/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचेकडून संदर्भाधीन पत्रान्वये गोंदिया जिल्ह्यातील गोंदिया तालुक्यातील १)अर्जुनी ते सावरी रस्ता व २) कोल्हापुरी बंधारा ते बटाणा रस्ता या योजनाबाह्य रस्त्यांचा ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समावेश करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे.

सदर रस्त्यांवरील गावांतील लोकांच्या दळणवळणाच्या दृष्टीने सदर रस्ते महत्त्वाचे आहेत. तसेच सदर रस्ते रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याबाबत जिल्हा परिषद, गोंदिया यांची मागणी आहे. त्यामुळे सदर रस्ते रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये ग्रामीण मार्ग म्हणून समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, गोंदिया यांची मागणी विचारात घेऊन, गोंदिया जिल्ह्यातील गोंदिया तालुक्यातील,

१) **अर्जुनी ते सावरी रस्ता** (एकूण लांबी ३.०० कि.मी.) हा रस्ता **ग्रामीण मार्ग क्र.२७१ अ** व

२) **कोल्हापुरी बंधारा ते बटाणा रस्ता** (एकूण लांबी २.०० कि.मी.) हा रस्ता **ग्रामीण मार्ग क्र.४२१** म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये "सदर रस्त्यांच्या भूसंपादनाकरीता कोणताही निधी देण्यात येणार नाही" या अटीवर समाविष्ट करण्यात येत आहेत.

परिणामी, गोंदिया जिल्ह्यातील **ग्रामीण मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकुण लांबीमध्ये **५.०० कि.मी.** इतकी वाढ होऊन एकूण लांबी (४४३८.८१० + ५.००) म्हणजेच **४४४३.८१० कि. मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८१०१०१५२६३६०६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d52614 3e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2018.10.10 15:28:53 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

२) उप सचिव,ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) विभागीय आयुक्त, नागपूर.

४) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,नागपूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

५) जिल्हाधिकारी, गोंदिया .

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया.

७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, गोंदिया.

८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

१०) निवडनस्ती.